**डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खत आयात करुन राज्यातील शेतकऱ्यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने राष्ट्रीयकृत बँकेकडून घ्यावयाच्या रु.२७० कोटी इतक्या कर्जास शासन हमी मंजूर करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
शासन निर्णय क्रमांक:- शाहमी-१००९/कृवपदुम/प्र.क्र.४४/अर्थबळ.
दिनांक:- ३ ऑगस्ट,२००९.

वाचा : १) शासन निर्णय, वित्त विभाग, क्र. शासन हमी-१०९९/प्र.क्र.६८/शासन हमी, दि. ५.११,१९९९

२) शासन निर्णय, कृषी व पदुम विभाग क्र.मकुअ-१३०८/प्र.क्र.६१/६ अे, दि.२५.४.२००८.

३) शा.नि.वि.वि.शाहमी-१००८/प्र.क्र.१८/शासन हमी, दि.२८.४.२००८.

४) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक शाहमी-१००८/कृवपदुम/प्र.क्र.४५/अर्थबळ, दिनांक १३.१.२००९.

५) शासन निर्णय, वित्त विभाग क्रमांक शाहमी-१००८/कृवपदुम/प्र.क्र.४५/अर्थबळ, दिनांक १३,३. २००९.

६) व्यवस्थापकीय संचालक , म.कृ.उ.वि.महामंडळ , मुंबई यांचे पत्र क्र.मकृउविमम/२८७/२००९,दि.२८.७.२००९.

**प्रस्तावना :-**

राज्यातील मागणीच्या तुलनेत खताच्या पुरवठ्यातील तूट भरुन काढण्यासाठी केंद्र शासनाच्या निर्देशानुसार केंद्र शासनाने नियुक्त केलेल्या मे.इंडियन पोटॅश लिमिटेड,मे.इफको लि.व आरसीएफ या खत कंपन्याकडून **डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया** खत आयात करुन ते राज्यातील शेतकऱ्यांना पुरवठा करण्यासाठी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाची **नोडल एजंन्सी** म्हणून नियुक्ती करण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे.याप्रमाणे डी.ए.पी. १.८४ लाख मे.टन, एम.ओ.पी. १ लाख मे.टन व युरिया १ लाख मे.टन खत असे एकूण ३.८४ लाख मे.टन खत आयात मागणी करण्याकरिता महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामडंळाला रु.२७०.०० कोटी ( रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त) चे कर्ज राष्ट्रीयकृत बँकेकडून (निविदा प्रक्रियेनुसार) घेण्याकरिता शासन हमी मंजूर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

**शासन निर्णय :**

राज्यातील शेतकऱ्यांना वेळेवर खताचा पुरवठा करण्याकरिता ३.८४ लाख मे.टन. डी.ए.पी.,एम.ओ.पी आणि युरीया खताची खत पुरवठादार कंपन्याकडे मागणी करण्याकरिता सध्याच्या आंतरराष्ट्रीय दराप्रमाणे रु.२७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त) इतकी रक्कम पुरवठा करणा-या खत कंपन्यांना मागणी आदेशासह महाराष्ट्र कृषि उद्योग विकास महामंडळाने अदा करण्याची आवश्यकता आहे. सबब, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाला **रु २७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त)** इतके कर्ज शासन हमीवर घेण्यास मंजूरी देण्याचा निर्णय शासनाने घेतलेला आहे. याकरिता महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाला राष्ट्रीयकृत बँकेकडून (निविदा प्रक्रियेनुसार) कर्ज घेण्यासाठी **रु.२७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त)** इतक्या रकमेकरिता शासन हमी मंजूर करण्यात येत आहे.

( कृ. मा. प. )

२. सदर शासन हमी रुपये २७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त)ची मुदत दिनांक ३१ मार्च, २०१० पर्यंत वैध राहील.

३. राष्ट्रीयकृत बँकेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा.

अ) राष्ट्रीयकृत बँकेकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाचा वापर फक्त केंद्र शासनाच्या निर्देशानुसार डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खतांच्या आयातीसाठीच करण्यात यावा.

ब) कर्ज देणा-या राष्ट्रीयकृत बँकेमध्ये महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ या संस्थेच्या नावे एक स्वतंत्र खाते (escrow A/c)उघडण्यात यावे. उपरोक्त खात्यातून शासन हमीवर घेतलेले रु.२७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त) व त्यावरील व्याजापोटी बँकेला देय असलेली रक्कम बँकेने परस्पर तात्काळ कापून घ्यावी. तद्नंतर फक्त कर्जाच्या शिल्लक रकमेवर व्याजाची आकारणी बँकेने करावी.

क) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने प्रचलित दराने डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताच्या पुरवठ्याची आगावू मागणी (Advance booking) नोंदविणाऱ्याकडून प्रथम खताच्या विक्री किमतीच्या कमीत कमी २५% रक्कम वसुल करावी. अशा मागणीमुळे प्राप्त होणारी रक्कम सदर संस्थानी उपरोक्त खात्यात जमा करावी. डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताची उपलब्धतेसंबंधीची माहिती सदर संस्थांनी मागणी नोंदविणाऱ्यांना द्यावी तसेच डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताचा पुरवठा करता आला नाही तर योग्य त्या व्याजासह नोंदणीची रक्कम परत करण्यात येईल असेही त्यांना स्पष्ट करण्यात यावे.

ड) आयतीत डी.ए.पी./ एम.ओ.पी आणि युरीया खताची विक्री तत्परतेने करण्यात यावी व विक्रीपोटी प्राप्त होणारी रक्कम उपरोक्त स्वतंत्र खात्यात जमा करण्यात यावी. आयातीत डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खत राज्यात ज्या ठिकाणी प्राप्त होईल, त्याच ठिकाणी त्याची विक्री करण्यात यावी. इतर ठिकाणी देशांतर्गत उपलब्ध असलेल्या डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीयाखताची विक्री करण्यात यावी.

इ) कोणत्याही विशिष्ट परिस्थितीमुळे डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताचा साठा शिल्लक राहीला तर त्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ यांची राहील. याबाबत संनियंत्रणाची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

ई) खताचा साठा सुरक्षित ठेवण्याची जबाबदारी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांची राहील. संबंधित कर्ज देणाऱ्या बँकेने त्याबाबत वेळोवेळी खात्री करावी.

प) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांचेकडून शासनास देय असलेल्या हमीशुल्काचा शासनास भरणा केल्याशिवाय संबंधित बँकेने कर्ज मंजूर /वितरित करु नये.

फ) कर्ज देणारी संबंधित बँक राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळास या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही.

भ) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची ९० दिवसांच्या आंत शासनास सूचना देणे संबंधित बँकेवर बंधनकारक असेल.

म) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ या संस्थेस कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय संबंधित बँकेला हमीपूर्ततेकरीता शासन हमीची प्रतिपुर्ती म्हणून वापर करता येणार नाही. संबंधित बँकेकडून महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबईच्या चल / अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन, वसुलीचा निर्णय झाल्यास, त्यावेळी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये कृषी व पदुम विभाग व वित्त विभाग यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा.

२.	सदर शासन हमी रुपये २७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त)ची मुदत दिनांक ३१ मार्च, २०१० पर्यंत वैध राहील.

३.	राष्ट्रीयकृत बँकेसमवेत शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबंधी करण्यात येणाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा.

अ)	राष्ट्रीयकृत बँकेकडून घेण्यात येणाऱ्या कर्जाचा वापर फक्त केंद्र शासनाच्या निर्देशानुसार डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खतांच्या आयातीसाठीच करण्यात यावा.

ब)	कर्ज देणा-या राष्ट्रीयकृत बँकेमध्ये महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ या संस्थेच्या नावे एक स्वतंत्र खाते (escrow A/c)उघडण्यात यावे. उपरोक्त खात्यातून शासन हमीवर घेतलेले रु.२७० कोटी (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त) व त्यावरील व्याजापोटी बँकेला देय असलेली रक्कम बँकेने परस्पर तात्काळ कापून घ्यावी. तद्नंतर फक्त कर्जाच्या शिल्लक रकमेवर व्याजाची आकारणी बँकेने करावी.

क)	महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने प्रचलित दराने डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताच्या पुरवठ्याची आगावू मागणी (Advance booking) नोंदविणाऱ्याकडून प्रथम खताच्या विक्री किमतीच्या कमीत कमी २५% रक्कम वसुल करावी. अशा मागणीमुळे प्राप्त होणारी रक्कम सदर संस्थानी उपरोक्त खात्यात जमा करावी. डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताची उपलब्धतेसंबंधीची माहिती सदर संस्थांनी मागणी नोंदविणाऱ्यांना द्यावी तसेच डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताचा पुरवठा करता आला नाही तर योग्य त्या व्याजासह नोंदणीची रक्कम परत करण्यात येईल असेही त्यांना स्पष्ट करण्यात यावे.

ड)	आयतीत डी.ए.पी./ एम.ओ.पी आणि युरीया खताची विक्री तत्परतेने करण्यात यावी व विक्रीपोटी प्राप्त होणारी रक्कम उपरोक्त स्वतंत्र खात्यात जमा करण्यात यावी. आयातीत डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खत राज्यात ज्या ठिकाणी प्राप्त होईल, त्याच ठिकाणी त्याची विक्री करण्यात यावी. इतर ठिकाणी देशांतर्गत उपलब्ध असलेल्या डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीयाखताची विक्री करण्यात यावी.

इ)	कोणत्याही विशिष्ट परिस्थितीमुळे डी.ए.पी./ एम.ओ.पी / युरीया खताचा साठा शिल्लक राहीला तर त्याची संपूर्ण जबाबदारी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ यांची राहील. याबाबत संनियंत्रणाची जबाबदारी संबंधित प्रशासकीय विभागाची राहील.

ई)	खताचा साठा सुरक्षित ठेवण्याची जबाबदारी महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांची राहील. संबंधित कर्ज देणाऱ्या बँकेने त्याबाबत वेळोवेळी खात्री करावी.

प)	महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांचेकडून शासनास देय असलेल्या हमीशुल्काचा शासनास भरणा केल्याशिवाय संबंधित बँकेने कर्ज मंजूर /वितरित करु नये.

फ)	कर्ज देणारी संबंधित बँक राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळास या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही.

भ)	महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची ९० दिवसांच्या आंत शासनास सूचना देणे संबंधित बँकेवर बंधनकारक असेल.

म)	महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ या संस्थेस कर्ज वसूलीसाठी सर्वतोपरी प्रयत्न केल्याशिवाय संबंधित बँकेला हमीपूर्ततेकरीता शासन हमीची प्रतिपुर्ती म्हणून वापर करता येणार नाही. संबंधित बँकेकडून महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबईच्या चल / अचल मालमत्तेची विक्री / लिलाव (Auction) करुन, वसुलीचा निर्णय झाल्यास, त्यावेळी एक समिती स्थापन करावी व त्या समितीमध्ये कृषी व पदुम विभाग व वित्त विभाग यांचा प्रत्येकी एक प्रतिनिधी घेण्यात यावा.

य) संबंधित बँकेच्या कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरीता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

र) संबंधित बँक, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल सोबत जोडलेल्या प्रपत्र अे मध्ये शासनास दर सहा महिन्यानी (दि.३१ मार्च / ३० सप्टेंबर) सादर करील.

वरील (अ) ते (र) पैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास शासन हमी अवैध होईल.

४. महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळासाठी रु.२७० कोटीची (अक्षरी रुपये दोनशे सत्तर कोटी फक्त) हमी अ.क्र.१ येथील शासन निर्णय, वित्त विभाग दिनांक ५ नोव्हेंबर,१९९९ मध्ये व अनुक्रमांक २ येथील शा.नि. कृ.व पदुम विभाग, दि.२५.४.२००८ मध्ये नमूद केलेल्या अटी व खालील अटीं व शर्तीच्या अधीन राहील:-

अ) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई हे Principal Debtor राहतील.

ब) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने संबंधित बँकेकडून उपलब्ध होणाऱ्या कर्जाबाबत आढावा घेऊन त्यासंबंधीच्या वित्तीय मर्यादा शासनाकडून निश्चित करुन घ्याव्यात.

क) संबंधित बँकेकडून घेतलेल्या कर्जाचा वापर महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळास शासन निर्णयात नमूद केलेल्या प्रयोजना व्यतिरिक्त इतर कोणत्याही प्रयोजनाकरिता करता येणार नाही.

ड) डी.ए.पी./एम.ओ.पी / युरीया खताची विक्री महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने रोखीने करावी.

ई) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई शासनाच्या पूर्व परवानगीशिवाय संबंधित बँकेकडून अधिक कर्ज घेणार नाही.

फ) कर्ज देणा-या राष्ट्रीयकृत बँकेने महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळास मंजूर केलेल्या कर्जाच्या आदेशामध्ये नमूद केलेल्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार कर्ज फेडीच्या शेवटच्या हप्त्याच्या दिनांकास हमी संपुष्टात येईल. सदर वेळापत्रकात नमूद केलेल्या विहित कालावधीसाठीच शासन हमी लागू राहील. या कालावधीनंतर कर्ज देणा-या राष्ट्रीयकृत बॅन्केला शासन हमी आवाहनीत करता येणार नाही.

ग) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाने दर महिन्याला कर्ज परतफेडीच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती कृषी व पदुम विभाग / वित्त विभागाकडे सादर करावी.

म) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ विहीत कार्यपध्दतीने लेखा परिक्षीत केलेल्या व संस्थेने मान्य केलेल्या संस्थेच्या लेख्याची एक प्रत शासनास सादर करावी.

५. **हमी शुल्क**

अ) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळास प्र.श.प्र.व.हमीशुल्काचा दर रु.२/- असा राहील. हे हमीशुल्क ज्या कालावधीकरीता देय राहील त्या कालावधीतील कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (total maximum outstanding amount) देय राहील. escrow account मधून महामंडळाकडून हमीशूल्काचा भरणा प्रथमत: करण्यात यावा.

ब) हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यानी करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तिय वर्षाच्या ३१ मार्च आणि / अथवा ३० सप्टेंबर रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) देय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल आणि / अथवा १ ऑक्टोबर रोजी करण्यात यावा.

क) देय हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम थकीत हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जून्या थकीत हमी शुल्काची वसुली, त्यानंतर त्यापेक्षा कमी जून्या हमीशुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

ड) देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास संस्थाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

इ) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ शासन हमी शुल्काची रक्कम "००७५-संकीर्ण, सर्वसाधारण सेवा-१०८-हमी शुल्क"या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा केली जाते याची खात्री करुन घ्यावी.

ई) हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची सांक्षाकित प्रत कृषी व पदुम विभागाने वित्त विभागास सापेक्षाने पाठवावी.

प ) महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळानी देय हमीशुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क कर्ज देणारी बँक शासनाकडे भरणा करेल व महामंडळाकडून वसूल करेल, अन्यथा शासन हमी अवैध ठरेल.

६. हा शासन निर्णय कृषी व पदुम विभागाच्या नस्ती क्र.राखते ३७०८/प्र.क्र.१९९/१७-अे वरील प्रस्तावित प्रस्ताव त्यांच्या सहमतीने व वित्त विभागाचा शासन हमी क्रमांक-२/२००९-२०१० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मुंबई समवेत कर्ज घेण्यासंबंधी करावयाच्या करारपत्रावर स्वाक्षरी करण्याकरिता कृषी व पदुम विभागातील संबंधित उप सचिव व वित्त विभागातील उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून, त्याचा सांकेतांक **क्रमांक-२००९०८०३१३२४१८००१** असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,**

**(गो. डो. तायडे )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

१) प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
२) व्यवस्थापकीय संचालक महाराष्ट्र कृषी उद्योग विकास महामंडळ, मर्या.मुंबई.
३) वित्त विभाग (साउ /ॠण व हमी संनियंत्रण कक्ष/ व्यय-१ ) मंत्रालय, मुंबई.
४) महालेखापाल, महाराष्ट्र- १/२ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/ नागपूर.
५) महालेखापाल, महाराष्ट्र - १/२ (लेखा परीक्षा), मुंबई/ नागपूर.
६) निवासी लेखा परिक्षा अधिकारी,
७) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई.
८) व्यवस्थापकीय संचालक, संबंधित राष्ट्रीयकृत बँक, मुंबई.
९) निवड नस्ती - अर्थबळ.

# ANNEXURE A

**Proforma in which the information in respect of repayment of loan and financial liability of the borrower is to be submitted by the lending institute to the Government every six month (1st April/ 1st Oct)**

1 **Name of Lending Institute:**

2 **Principal Debtor:**

3 **Name of Administrative Dept:**

4 **Guarantee No:**

5 **Date of Validity of Guarantee:**

6 **Report for the period from: To**

**Guarantee & Repayment during the period** **(Rupees)**

| | | Principal | Interest | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding guarantee at beginning of the period | | | |
| 2 | Additional guarantee sanctioned, if any during the period | | | |
| 3 | Toal Outstanding ( 1+ 2 ) | | | |
| 4 | Repayment of loan | | | |
| 5 | Balance at end of the period ( 3 - 4 ) | | | |
| 6 | Amount Credited in to Escrow A/C | | | |
| 7 | Net Balance ( 5 - 6 ) | | | |

7 **Payment of Guarantee fees** **(Rupees)**

| | Outstanding Amount | G . F. | Penal Fee | Total |
|---|---|---|---|---|
| 1 | Outstanding at the Beginning | | | |
| 2 | G. F. Paid (Rs.) | | | |
| 3 | Date | | | |
| 4 | Challan No. | | | |
| 5 | Balance at end of the period ( 1 - 2 ) | | | |

8 **Types of assets taken as security against amount of loan / outstanding**

| Description Secured | Estimated Value | How |
|---|---|---|
| (!) | | |
| (ii) | | |
| (iii) | | |
| Total | | |

( P.T.O.)

| | |
|---|---|
| **9** Types of inspection of assets / due diligency by lending institute during last 6 months to ensure loans are properly secured. | |
| **10**. Financial Health of Principal Debtor<br>(I) Total Turnover of the Principal Debtor<br>(II) Total Profits<br>(iii) % of profits as % of loan amount | |
| **11.** Is in the opinion of lending institute,the borrowing institute in a position to service the debt against which government guarantee is given | |
| **12**. Is in view of the lending institute, the borrowing institute being managed efficiently | |
| **13.** If not, type of corrective action proposed to be taken by lending institute | |
| **14**. Has the lending institute ensured that no further loans have been taken by the borrowing institute since the government guarantee was given | |
| **15.** Has the lending institute ensured that the guarantee fees has been paid to the Goveernment in order to keep the guareante alive and valid | |